“गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे " योजनेंतर्गत सन २०१७-१८ व सन २०१८-१९ मध्ये निवड केलेल्या शेतकरी गटांना सन २०२१ - २२ (मार्च अखेर) साठी रु. ५.१३५४ कोटी निधी उपलब्ध करुन देणेबाबत..

## महाराष्ट्र शासन

**कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: कृविका-२०१७/प्र.क्र.३२/भाग-१/३-अे**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- ०८ मार्च, २०२२

संदर्भ : १. कृषि व पदुम विभाग , शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७ / प्र.क्र.३२/ भाग१/ ३-अे,दि.५.१०.२०१८
२. कृषि व पदुम विभाग , शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७ / प्र.क्र.३२/ भाग१/ ३-अे,दि.९.९.२०१९
३. कृषि व पदुम विभाग , शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७ / प्र.क्र.३२/ भाग१/ ३-अे,दि.११.९.२०१९
४. कृषि व पदुम विभाग , शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७ / प्र.क्र.३२/ भाग१/ ३-अे,दि.१४.०३.२०२०
५. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३ दि.०४/०५/२०२०
६. कृषि व पदुम विभाग , शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७ / प्र.क्र.३२/ भाग१/ ३-अे,दि.२४.०८.२०२०
७. कृषि व पदुम विभाग , शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७ / प्र.क्र.३२/ भाग१/ ३-अे,दि.१६.१२.२०२०
८. कृषि व पदुम विभाग , शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७ / प्र.क्र.३२/ भाग१/ ३-अे,दि.१६.१२.२०२०
९. कृषि व पदुम विभाग , शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७ / प्र.क्र.३२/ भाग१/ ३-अे,दि.२६.०३.२०२१
१०. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि.१४/१०/२०२१
११. कृषि व पदुम विभाग , शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७ / प्र.क्र.३२/ भाग१/ ३-अे,दि.२४.१२.२०२१
१२. संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय ,पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.कृ.आ/संचा. आत्मा/गटशेती/वि.प्र.५/४३०४९/२०२१ दि. २७.१२.२०२१
१३. संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय ,पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.कृ.आ/संचा. आत्मा/गटशेती/वि.प्र.५/४३२६१/२०२१ दि. २८.१२.२०२१
१४. संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय ,पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.कृ.आ/संचा. आत्मा/गटशेती/वि.प्र.५/२१८२/२०२२ दि. २०.०१.२०२२
१५. कृषि व पदुम विभाग , शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७ / प्र.क्र.३२/ भाग१/ ३-अे,दि.३०.१२.२०२१

**प्रस्तावना :-**

सन, २०२२ पर्यंत शेतकऱ्यांचे उत्पन्न दुप्पट करण्याच्या केंद्र शासनाच्या दृष्टीकोणास अनुसरुन पीक उत्पादन वाढविण्यासाठी निविष्ठा, प्रशिक्षण, सिंचन, यांत्रिकीकरण, काढणीपश्चात तंत्रज्ञान, कृषिमाल प्रक्रीया व पणन इत्यादी बाबी महत्वाच्या ठरतात. राज्यातील शेतकऱ्यांची जमीनधारणा कमी असल्याने शेतकऱ्यांच्या उत्पादनात भरीव वाढ होण्यासाठी सामुहिक शेती, शेती करण्याची आधुनिक पध्दती व काटेकोर नियोजनाची आवश्यकता ही बाब विचारात घेऊन “गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे” ही योजना राबविण्यास संदर्भाधीन दि. ०५.१०.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

"गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतक-यांच्या गट शेतीस चालणा देणे" या योजनेस संदर्भाधीन दि.०९.०९.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दोन वर्षाची मुदतवाढ (सन २०२०-२१ पर्यंत) देण्यात आली होती. तथापि वित्त विभागाच्या दि.०४.०५.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये Covid-१९ च्या पार्श्वभुमीवर निधीची उपलब्धता व लॉकडाउन मुळे कामांसाठी झालेला विलंब लक्षात घेता या गटांना प्रकल्प आराखड्याप्रमाणे कामे करणे शक्य होण्यासाठी संदर्भाधीन दि.२४.१२.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये "गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे" ही योजना राबविण्यास एक वर्षाची (सन २०२१-२२), दि.०१.०४.२०२१ ते ३१.०३.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. सन २०२१-२२ करिता “गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे” या योजनेसाठी रु.७५.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. तथापि कोविड-१९ पॅन्डॅमिक च्या पार्श्वभूमीवर, संदर्भाधीन दि.१४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाने विहीत केल्याप्रमाणे सदर योजनेकरिता एकूण अर्थसंकल्पित रु.७५.०० कोटी निधीच्या ५० टक्केच्या मर्यादेत म्हणजेच एकूण रु. ३७.५० कोटी निधी दि.३०/१२/२०२१ च्या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि) यांना उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

त्यानुषंगाने आता संचालक(आत्मा) यांनी संदर्भाधीन दि. २०.०१.२०२२च्या पत्रान्वये सदर योजने अंतर्गत उर्वरित कामांसाठी कामांच्या प्रगतीप्रमाणे व प्रकल्प आराखड्याप्रमाणे सन २०२१-२२ मार्च अखेरपर्यंत साठी एकुण उर्वरित निधीपैकी रक्कम रु. ५.१३५४ कोटी निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे.

त्यास अनुसरुन गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतक-यांच्या गट शेतीस चालना देणे या योजने अंतर्गत सन २०१७-१८ व २०१८-१९ मध्ये निवडलेल्या गटांना मंजूर प्रकल्प आराखड्याप्रमाणे अपुर्ण प्रकल्पांचे काम पुर्ण करण्याकरिता सन २०२१-२२ मार्च अखेर करिता रु. ५.१३५४ कोटी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतक-यांच्या गट शेतीस चालना देणे या योजने अंतर्गत सन २०१७-१८ व २०१८-१९ मध्ये निवडलेल्या गटांना मंजूर प्रकल्प आराखड्याप्रमाणे अपुर्ण प्रकल्पांचे काम पुर्ण करण्याकरिता सन २०२१-२२ करिता रु. ५.१३५४ कोटी (अक्षरी रुपये

पाच कोटी तेरा लाख चौपन्न हजार फक्त) एवढा निधी आयुक्त ( कृषि ) यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या वरील खर्च सन २०२१-२२ मध्ये मंजुर झालेल्या अनुदानातून खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. डी-३**
**२४०१- पीक संवर्धन,**
**१०९ विस्तार व शेतकरी प्रशिक्षण ,**
**(०१)माहिती व प्रचार (०१) (५५) गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे (१००% राज्य योजना) (२४०१ अे ७८२) योजनांतर्गत ( दत्तमत )**

३. सन २०२१-२२ करीता यापूर्वी वितरीत केलेला निधी व या शासन निर्णयान्वये वितरीत होणारा रु. ५.१३५४ कोटी निधी अखर्चित राहणार नाही याची दक्षता आयुक्त (कृषि) यांनी घ्यावी.

४. सदर योजनेअंतर्गत प्राप्त होणारा निधी खर्ची घालण्याकरिता आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी तसेच सहायक संचालक लेखा-१, कृषि आयुक्तालय, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. सदर योजनेअंतर्गत मानधनाच्या /खर्चाच्या रकमा DBT (Direct Benefit Transfer) द्वारे प्रदान करण्यात याव्यात.

५. या शासन निर्णयाद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

६. सदरचा शासन निर्णय नियोयजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १९/का. १४३१ दि.२४/०१/२०२२ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र ३५/२०२२/व्यय-१ दि.१०/०२/२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७ सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२२०३०८१२५००९९४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2022.03.08 12:53:45 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.

४. मा. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त,कृषि,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
६. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
७. संचालक आत्मा, तथा कृषि नोडल अधिकारी,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
८. सर्व संचालक / कृषि सहसंचालक,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
९. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१०.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी तथा प्रकल्प संचालक (आत्मा)
११.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१२.सर्व उपसंचालक, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे कार्यालय
१३.महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता),मुंबई
१४.महालेखापाल,महाराष्ट्र-२,(लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता ),नागपूर
१५. निवड नस्ती (का.३ अे).